अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातीलअधिकारी/कर्मचाऱ्यांकरिता १० अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र : मावज २०१९/प्र.क्र.२१०/३४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ फेब्रुवारी,२०२०.

संदर्भ : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९

प्रस्तावना :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या पदावर नियुक्त झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविणे याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त असणाऱ्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील अधिकारी/कर्मचारी यांची वरिष्ठ सहायक संचालक-१, लिपिक टंकलेखक-३, वाहनचालक-२, शिपाई-१, संदेशवाहक-१, मदतनीस-१ व अंधारकोठडी सहायक-१ अशी एकूण १० अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रामाणपत्र सादर केलेले, जात पडताळणी समितीच्या निर्णयाविरोधात मा. न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा.न्यायालयाने स्थगिती न दिलेले व जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर या शासननिर्णयान्वये १० अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत.

१. विवरणपत्र क्रमांक १:- जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या तसेच जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेले एकूण ७ अधिकारी/कर्मचारी.

२. विवरणपत्र क्रमांक २:- जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेले ३ कर्मचारी.

३. उपरोक्त नमूद केल्यानुसार एकूण १० अधिसंख्य पदे संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत. सदर अधिसंख्य पदांबाबत शासन निर्णय क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.०९.२००१ मधील कार्यपध्दतीनुसार वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात आली आहे.

४.	ज्या अधिकारी/कर्मचारी यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात मा. न्यायालयामध्ये याचिका प्रलंबित असतील अशा प्रकरणी सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १६ ब यांच्या शासन निर्णय दिनांक २१.१२.२०१९ मधील ३(क) येथील सूचनेनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने मा. सर्वोच्च न्यायालयाचे दिनांक ०६.०७.२०१७ चे आदेश संबंधित न्यायालयाच्या निदर्शनास आणून, अशी प्रकरणे तात्काळ निकाली काढण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी. तद्नंतर सदर अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने करावी.

५.	अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकारी/कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी करावयाच्या नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

६.	शासन निर्णयापुर्वी सेवा समाप्त करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचारी हे सेवासमाप्तीपुर्वी ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत आहे. सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता अधिसंख्य पद अस्तित्वात राहिल.

७.	या आदेशान्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्याबाबतचे आदेश संबंधित नियुक्ती सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १६ ब, शासन निर्णय दिनांक २१.१२.२०१९ नुसार तात्काळ निर्गमित करावेत व त्याची प्रत या विभागास तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

८.	अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी/कर्मचारी सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत, त्या विभागाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

९.	हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३२/आपुक, दिनांक १३.१.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२०५१०५९०३४००७ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2020.02.05 11:01:27 +05'30'

**( रा.ना.मुसळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१) सचिव (मावज), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४) संचालक (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
५) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) सर्व विभागीय माहिती कार्यालय/जिल्हा माहिती कार्यालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
९) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१६ ब), मंत्रालय, मुंबई
११) वित्त विभाग (कार्यासन आ.पु.क), मंत्रालय, मुंबई
१२) संबंधित अधिकारी/कर्मचारी (मावज मार्फत)
१३) निवडनस्ती.

जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या तसेच जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेले अधिकारी/कर्मचारी.

**विवरणपत्र - १**

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले पद | नियुक्तीचा दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | मूळ नियुक्ती झालेले पद |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. शामचंदराव सुर्यवंशी | वाहनचालक, जिल्हा माहिती कार्यालय, हिंगोली | १८.०४.१९९५ | ३०.०४.२०२० | वाहनचालक |
| २ | श्री. सुधीर किशनराव मग्गीरवार | लिपिक-टंकलेखक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | ४.९.१९९८ | ३१.१०.२०२९ | लिपिक-टंकलेखक |
| ३ | श्री. राम काळू गोंदके | लिपिक-टंकलेखक, उपमाहिती कार्यालय, डहाणू | ४.५.२००५ | ३१.०५.२०३९ | लिपिक-टंकलेखक |
| ४ | श्री. गंगाधर माणिकराव निरडे | संदेशवाहक, जिल्हा माहिती कार्यालय, परभणी | ६.११.१९८९ | ३१.०३.२०२७ | संदेशवाहक |
| ५ | श्री. अशोक भिवसन सुरडकर | मतदनीस, संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मराठवाडा विभाग, औरंगाबाद यांचे कार्यालय, औरंगाबाद | १७.३.१९९८ | ३०.०४.२०२९ | मतदनीस |
| ६ | श्री. मोहन मोतिराम कोळी | वाहनचालक, जिल्हा माहिती कार्यालय, लातूर | २७.१२.१९९५ | ३१.०५.२०२८ | वाहनचालक |
| ७ | श्री. संजय नवलकोळी | अंधार कोठडी सहायक, उप माहिती कार्यालय, डहाणू | २.६.१९९५ | २९.०२.२०३२ | अंधार कोठडी सहायक |

जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेले कर्मचारी.

**विवरणपत्र-२**

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले पद | नियुक्तीचा दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | मूळ नियुक्ती झालेले पद |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. विनोद नरहरराव रापतवार | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), गट अ (कनिष्ठ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई | २४.३.१९९५ | ३१.३.२००३ (म.नं.) | सहायक संचालक (माहिती) |
| २ | श्रीमती दर्शना जि. बस्वत | लिपिक-टंकलेखक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई | ८.८.१९९७ | ३.१२.२००२ | लिपिक-टंकलेखक |
| ३ | श्री. अनिल विठ्ठल कोळी | शिपाई, जिल्हा माहिती कार्यालय, कोल्हापूर | १.९.१९९७ | १४.५.२००९ | शिपाई |